राज्यातील अल्पमुदत सहकारी पतसंरचनेचे (STCCS) सक्षमीकरण करण्यासाठी उपयायोजना सूचविण्या- करिता तज्ञ समिती गठित करण्याबाबत

**महाराष्ट्र शासन**

**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**

**शासन निर्णय क्रमांक :- सीसीआर-०३१३/ प्र.क्र. १४४/२-स**

**मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,मंत्रालय,**

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

दिनांक : ११/९/२०१४

**वाचा:-**

१) शासन निर्णय क्र. सीसीआर-१४०६/प्र.क्र.२४७/२-स, दिनांक १७/०५/२००६

**प्रस्तावना :-**

राज्यात सध्या त्रिस्तरीय अल्प मुदत सहकारी पतसंरचने अंतर्गत ( STCCS ) शेतकऱ्यांना राज्य स्तरावर महाराष्ट्र राज्य सहकारी बँक, जिल्हा स्तरावर ३० मध्यवर्ती सहकारी बँका व गाव पातळीवर २१३८२ प्राथमिक कृषी पतपुरठा सहकारी संस्थांमार्फत पीक कर्ज पुरवठा करण्यात येतो. तसेच या पतसंरचनेमार्फत शेतकऱ्यांना मध्यम मुदत व दीर्घ मुदत शेती कर्ज पुरवठा करण्यात येतो.

उपरोक्त संदर्भ क्र.१ मधील शासन निर्णयानुसार सन २००६-०७ या अर्थिक वर्षापासून राज्यातील जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकांमार्फत प्राथमिक कृषी पतपुरवठा सहकारी संस्थाना वार्षिक ४% दराने व प्राथमिक कृषी पतपुरवठा सहकारी संस्थांमार्फत शेतकरी सभासंदाना वार्षिक ६% व्याज दराने अल्प मुदत पीक कर्ज पुरवठा करण्यात येतो.

महाराष्ट्र राज्य सहकारी बँकेकडून जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकांना अल्प मुदत पीक कर्ज पुरवठा करण्यासाठी फेर कर्ज उपलब्ध करुन देण्यात येते. ज्या जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकेचे NPA चे प्रमाण २०% पर्यंत आहे अशा बँकेस राज्य बँकेकडून ९.५% व्याज दराने व ज्या जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकेचे NPA चे प्रमाण २०% पेक्षा जास्त आहे अशा बँकेस राज्य बँकेमार्फत ९.७५% व्याज दराने फेर कर्ज उपलब्ध करुन देण्यात येते. तसेच राज्यातील जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकांचा Prime Lending Rate (PLR) सुमारे १० ते १०.५% एवढा आहे. तथापि, उपरोक्त संदर्भ क्र.१ मधील शासन निर्णयानुसार जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकांमार्फत प्राथमिक कृषी पतपुरठा सहकारी संस्थांना वार्षिक ४% दराने पीक कर्ज पुरवठा करावा लागतो. त्यामुळे सन २००६-०७ या आर्थिक वर्षापासून जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकाना पीक कर्ज वाटपाच्या व्यवहारात नुकसान सोसावे लागत आहे.

सन २००६-०७ पूर्वी प्राथमिक कृषी पतपुरवठा सहकारी संस्थांना पीक कर्ज पुरवठयात व्याजाचा ३% दुरावा मिळत होता. मात्र उपरोक्त संदर्भ क्र.१ मधील शासन निर्णयानुसार शेतकऱ्यांना ६% व्याज दराने कर्ज पुरवठा करण्याबाबत शासनाने धोरण निश्चित केल्यामुळे प्राथमिक कृषी पतपुरवठा सहकारी संस्थांचा व्याजातील दुरावा ३% वरुन २% एवढा कमी झाला आहे. या बाबीचा प्राथमिक कृषी पतपुरवठा सहकारी संस्थांच्या अर्थक्षमतेवर अनिष्ट परिणाम होत असल्याचे शासनाच्या निदर्शनास आले आहे. वैद्यनाथन पॅकेज अंतर्गत या संस्थांना अर्थसहाय्य उपलब्ध झाल्यानंतर देखील काही प्राथमिक कृषी पतपुरवठा सहकारी संस्थांना त्यांचा व्यवस्थापन खर्च व आस्थापना खर्च भागविण्यात अडचणी येत आहेत.

राज्यातील शेतकऱ्यांना पीक कर्ज पुरवठा करण्यात प्राथमिक कृषी पतपुरवठा सहकारी संस्थांचे योगदान महत्वपूर्ण आहे. सध्या राज्यातील सुमारे ६५% शेतकऱ्यांना प्राथमिक कृषी पतपुरवठा सहकारी संस्थांमार्फत पीक कर्ज पुरवठा करण्यात येत आहे. ही बाब विचारात घेता अल्प मुदत सहकारी पतसंरचनेअंतर्गत (STCCS ) कार्यरत असलेल्या जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँका व गाव पातळीवर कार्यरत असलेल्या प्राथमिक कृषी पतपुरवठा सहकारी संस्थांच्या अडचणींचा अभ्यास करुन अल्प मुदत सहकारी पतसंरचना अधिक प्रभावशाली करणे, प्राथमिक कृषी पतपुरवठा सहकारी संस्था बळकट करण्यासाठी आवश्यक ती माहिती संकलित करणे, सध्याच्या पध्दतीतील उणिवा शोधून काढणे, जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकांच्या व प्राथमिक कृषी पतपुरवठा सहकारी संस्थांच्या तोटयाची कारणे समजून घेणे व त्यावर उपाययोजना सूचविण्यासाठी तज्ञ समिती गठित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** :-

राज्यातील अल्प मुदत सहकारी पतसंरचने अंतर्गत ( STCCS ) कार्यरत असलेल्या जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँका व गाव पातळीवर कार्यरत असलेल्या प्राथमिक कृषी पतपुरवठा सहकारी संस्थांच्या अडचणींचा अभ्यास करुन अल्प मुदत सहकारी पतसंरचना अधिक प्रभावशाली करणे, प्राथमिक कृषी पतपुरवठा सहकारी संस्था बळकट करण्यासाठी आवश्यक ती माहिती संकलित करणे, सध्याच्या पध्दतीतील उणिवा शोधून काढणे, जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकांच्या व प्राथमिक कृषी पतपुरवठा सहकारी संस्थांच्या तोटयाची कारणे समजून घेणे व त्यावर उपाययोजना सूचविण्यासाठी या शासन निर्णयाद्वारे खालीलप्रमाणे तज्ञ समिती गठित करण्यात येत आहे :-

| | | |
|---|---|---|
| १. सचिव ( सहकार ) | - | अध्यक्ष |

२. मुख्य महाप्रबधंक, नाबार्ड, पुणे - सदस्य
३. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी बॅंक मर्या., मुंबई - सदस्य
४. प्रशासक, कोल्हापूर जिल्हा मध्यवर्ती सहकारी बॅंक मर्या. - सदस्य
५. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा मध्यवर्ती सहकारी बॅंक मर्या., सिंधुदुर्ग, जालना, अकोला - सदस्य
६. चेअरमन, प्राथमिक कृषी पतपुरवठा सहकारी संस्था मर्या. - सदस्य (सहकार आयुक्त यांनी शिफारस केलेले २ प्रतिनिधी)
७. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे - सदस्य सचिव

वरील तज्ञ समितीने जिल्हा मध्यवर्ती सहकारी बॅंका व प्राथमिक कृषि पतपुरवठा सहकारी संस्थांच्या कामकाजातील अडचणी विचारात घेऊन या संस्थांच्या सक्षमीकरणासाठी उपाययोजना सूचविणारा अहवाल शासनास तीन महिन्यात सादर करावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०९१२१३२२४७६००२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Amolkar Vijay Ganpat

Digitally signed by Amolkar Vijay Ganpat
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=CMTD, postalCode=400032, st=MAHARASHTRA, cn=Amolkar Vijay Ganpat
Date: 2014.09.12 13:17:45 +05'30'

**(विजय अमोलकर)**

**कक्ष अधिकारी**

प्रति,

१. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.
२. मा. मंत्री (सहकार) यांचे खाजगी सचिव.
३. मा. राज्यमंत्री (सहकार) यांचे खाजगी सचिव.
४. मा. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
५. मा. अप्पर मुख्य सचिव (वित्त) मंत्रालय , मुंबई -३२
६. सचिव (सहकार), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

७. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.

८. आयुक्त, कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.

९. संचालक, पणन संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.

१०. महाव्यवस्थापक, राष्ट्रीय कृषी व ग्रामीण विकास बँक, प्रादेशिक कार्यालय, पुणे.

११. मुख्य अधिकारी, रिझर्व बँक ऑफ इंडीया, ॲग्रीकल्चरल क्रेडीट डिपार्टमेंट, सेंट्रल ऑफिस, गारमेंट हाऊस, मुंबई-४०० ०१८.

१२. सर्व विभागीय सह निबंधक, सहकारी संस्था.

१३. सर्व जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था.

१४. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी बँक, मुंबई.

१५. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँक मर्या.

१६. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई.

१७. निवड नस्ती - २ -स.